**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत प्रायोगिक तत्वावर कुशल कामाची देयके पंचायत समिती स्तरावरून वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग, रोहयो प्रभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक- मग्रारो-२०१४/ प्र.क्र.१०४/मग्रारो-१०अ,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ०७ फेब्रुवारी, २०१७.

वाचा:- १) शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांक- मग्रारो-२०१०/ प्र.क्र.२/ रोहयो-१०अ, दिनांक १३ ऑक्टोबर, २०११.

शासन परिपत्रक-

महाराष्ट्र राज्य ग्रामसेवक संघटना यांच्या मागण्यांबाबत शासनस्तरावर वेळोवेळी बैठका आयोजित करून त्यांच्या ब-याच मागण्यांवर निर्णय घेण्यात आलेले आहेत व त्यानुसार शासनाने वेळोवेळी सविस्तर आदेश निर्गमित केलेले आहेत. महाराष्ट्र राज्य ग्रामसेवक संघटना यांनी कुशल कामाची देयके पंचायत समिती स्तरावरून वितरण करणेबाबत मागणी केली आहे. या मागणीवरसुध्दा शासनस्तरावर मा. मंत्री, रोहयो व सचिव, रोहयो स्तरावर चर्चा करुन तसेच आयुक्त, नरेगा, नागपूर यांचे अभिप्राय विचारात घेवून सदर मागणीचा विचार करण्याचे स्पष्ट करण्यात आलेले आहे.

२. सद्यस्थितीत शासन निर्णय दिनांक १३ ऑक्टोबर, २०११ अन्वये महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत कुशल खर्चाची देयके अदा करण्याबाबत शासनाने कार्यपध्दती निश्चित केली आहे. त्यानुसार कुशल देयके अदा करताना ग्रामपंचायत व इतर यंत्रणा स्तरावर जबाबदारीचे वाटप करण्यात आलेले आहे. त्याचप्रमाणे प्रमाणित केलेली कुशल देयके पारित झाल्यावर एक आठवड्याच्या आत पुरवठादारास रक्कम वर्ग करण्याच्या सूचना देण्यात आलेल्या आहेत.

३. परंतु या कामामध्ये अधिक सुसूत्रता आणण्यासाठी व पुरवठादारास यंत्रणास्तरावर व कार्यक्रम अधिकारी पातळीवरून (गट विकास अधिकारी, पंचायत समिती यांचे पातळीवरून) थेट देयके विहित कालावधीमध्ये पुरवठादारास अदा करण्यात यावी अशी विनंती संघटनेने केली आहे. ही पध्दत सध्या मध्यप्रदेश राज्यात लागू करण्यात आलेली आहे. तसेच याबाबत रोजगार हमी योजना समितीनेसुध्दा महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत कुशल कामाची देयके पंचायत समिती स्तरावरून वितरण करणेबाबत निर्देश दिलेले आहेत. मा. मंत्री (रोहयो) व सचिव (रोहयो) स्तरावर झालेल्या चर्चेनुसार व आयुक्त, नरेगा, नागपूर यांचे अभिप्राय विचारात घेवून कुशल कामाची देयके पंचायत समितीस्तरावरुन वितरीत करणेबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

४. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत कुशल कामाची देयके पंचायत समिती स्तरावरून वितरण करणेबाबत प्रायोगिक तत्वावर प्रथम **नागपूर जिल्ह्यातील कळमेश्वर व धुळे जिल्हयातील सिंदखेडा या तालुक्यात ६ महिन्यांकरिता राबविण्यासाठी** शासन मान्यता देत आहे.

५. ग्रामपंचायत कार्यान्वयीन यंत्रणा असल्यास कुशल रकमेची देयके ग्रामपंचायतीमार्फत गट विकास अधिकारी यांचेकडे सादर करण्यात यावीत. या संदर्भात प्रचलित कार्यपध्दती पूर्वीप्रमाणेच कायम राहील. प्राप्त झालेल्या देयकांची MIS वर नोंदणी करण्यात येईल. पंचायत समिती स्तरावर कुशल रकमेची देयके व आवश्यक अन्य माहिती/कागदपत्रे/प्रमाणपत्रे प्राप्त झाल्यानंतर तांत्रिक व लेखा शाखेमार्फत छाननी होवुन गट विकास अधिकारी त्यास नियमानुसार योग्य रकमेस प्रदानाकरिता मंजूरी देतील. त्यानंतर अश्या देयकांची MIS वर मटेरियल लिस्ट संबंधित डाटा एंट्री ऑपरेटर मार्फत तयार करण्यात येईल. अशी मटेरियल लिस्ट

तपासून पहिले स्वाक्षरीकार ( सहाय्यक लेखाधिकारी) FTO तयार करून त्यावर digital स्वाक्षरी करतील. त्यानंतर सदर FTO द्वितीय स्वाक्षरीकार ( गट विकास अधिकारी) यांचेकडे जाईल. गट विकास अधिकारी सदर FTO योग्य असल्याची खात्री करून त्यावर आपली Digital स्वाक्षरी करतील.

६. प्रचलित पध्दतीनुसार वरिलप्रमाणे प्रक्रिया झाल्यानंतर FTO द्वारे प्रदान केलेली रक्कम थेट पुरवठादार यांचे खात्यावर त्यांना Vendor म्हणून घोषित करावयाचे असल्यामुळे जमा करण्यात येईल. Vendor म्हणून घोषित करण्यासाठी पुढीलप्रमाणे कार्यपध्दती निश्चित करण्यात आली आहे.

I. ग्रामपंचायत ऐवजी पुरवठादार संस्था ( Supplier/ Service Provider) यांना Vendor म्हणून घोषित करणे. त्यानंतर अशा पुरवठादाराचे TIN क्रमांक/VAT नोंदणी क्रमांक/ PAN क्रमांक इ. माहिती गोळा करून व त्यानंतर त्यास ग्रामपंचायतीच्या मान्यतेसह ही माहिती पंचायत समिती स्तरावर सादर करावी. या माहिती आधारे पुरवठादारांची नोंदणी MIS वर Vendor म्हणून केली जाईल.

II. MIS वर पुरवठादारांची Vendor म्हणून नोंदणी करणे (सद्या ग्रामपंचयतीची नोंद Vendor म्हणून झालेली आहे, अशा ग्रामपंचायतींना पाठविलेली FTO प्रलंबित नसल्याची खात्री करून सर्व ग्राम पंचायतीची Vendor म्हणून झालेली नोंदणी रद्द करणे व त्यांची खाती MIS वरून unfreeze करणे). यासाठी पुरवठादाराचे नांव, पूर्ण पत्ता, अचूक व कार्यरत असलेले बँक खाते क्रमांक, बँकेचे नांव व शाखा आणि IFSC Code, पुरवठादारांचे TIN क्रमांक, VAT नोंदणी क्रमांक, PAN क्रमांक ई. माहिती ग्रामपंचायत कडून प्रमाणित करून मागवावी व त्याची Data entry करणे हे काम पंचायत समिती स्तरावरून करण्यात यावे.

III. कुशल देयकांची रक्कम पुरवठादार ( Vendor) यांचे बँक खात्यात जमा होण्यासाठी त्यांचे/ फर्मचे नांव, पत्ता, अचूक व कार्यरत असलेले बँक खाते, बँकेचे नांव व शाखा आणि IFSC Code घेणे तसेच प्रत्येक देयकाच्या मागे हे नमूद करून त्यास सांक्षाकित करण्याची जबाबदारी संबंधित ग्रामसेवक यांची राहील. अचूक खाते क्रमांकाअभावी झालेल्या चुकीच्या प्रदानासाठी ग्राम सेवक जबाबदार राहातील. त्यामुळे त्यांनी वर दर्शविलेला तपशिल अचूक नोंदविण्याची दक्षता घ्यावी. या तपशिलावर संबंधित पुरवठादाराचे सांक्षांकन घेण्यास हरकत नसावी.

IV. एखादे देयक नियमानुसार पारित होवून अदा झाल्यानंतर त्याच बाबीचे देयक दुबार सादर झाल्यास (उदा. देयकाच्या द्वितीय प्रतिआधारे देयक सादर होणे) अथवा मंजूर होवून अदा झाल्यास त्याची जबाबदारी देयक तयार करणा-या ग्राम सेवकाची राहील.

V. पंचायत समिती मार्फत कुशल रकमेची देयके अदा करताना नवीन पुरवठादार निर्माण झाल्यास त्याची MIS वर नोंदणी करताना वर अ.क्र. २ येथे नमूद केलेली कार्यपध्दती अनुसरावी.

VI. ग्रामपंचायतीकडून सरपंच व सचिव यांचे स्वाक्षरीनिशी पुरवठादाराची Vendor म्हणून नोंद करण्याचा प्रस्ताव प्राप्त झाल्याशिवाय पंचायत समिती स्तरावरून त्यांची MIS वर नोंद करण्यात येवू नये.

VII. उपरोक्त कार्यपध्दतीची सुरुवात या आदेशाच्या दिनांकापासुन करण्यात यावी.

VIII. सद्यस्थितीत एखादे देयक प्रचलित पध्दतीनुसार ग्रामपंचायतीस अदा झाले असेल व आता नविन प्रणाली अवलंबवयाची असेल तेव्हा ग्राम पंचायतीकडे प्राप्त झालेली सर्व देयके जास्तीतजास्त ७ दिवसाचे आत प्रत्यक्ष पुरवठादारास अदा करून हिशोब बंद करणे आवश्यक राहील. **या सुचनाचे संबंधितांनी सक्त पालन करणे आवश्यक आहे**. जर ७ दिवसापेक्षा जास्त विलंब झाल्यास विलंब आकार वसुल करण्यात यावा व ज्या स्तरावर विलंब होईल त्या स्तरावरील जबाबदार अधिकारी/ कर्मचारी यांचेकडुन विलंब आकार वसुल करण्यात यावा.

IX. ग्राम पंचायत वगळता अन्य कार्यान्वयीन यंत्रणांच्या कुशल रकमेची देयके तहसिलदार यांचे मार्फत मंजूर करून यंत्रणांच्या तालुकास्तरीय कार्यालयाकडे पुरवठादारास अदागीस्तव वर्ग करण्यात येतात. हीच कार्यपध्दती पुढील आदेशापर्यंत यापुढेही सुरू राहील त्यात कोणताही बदल नाही.

७. प्रस्तावित पध्दतीमध्ये ग्राम पंचायत प्रत्यक्ष कार्यान्वयीन यंत्रणा असताना त्यांचे कामावरील नियंत्रण, सहभाग कमी होणार नाही याकडे प्रामुख्याने लक्ष देण्यात यावे.

८. सद्यस्थितीत ग्राम पंचायतींना कुशल देयकांपोटी अग्रिम देण्याची सुविधा आहे. यामध्ये ग्राम पंचायत त्यांचे स्तरावर साहित्याची खरेदी करते व पुरवठादारास देयक अदा करते आणि घेतलेल्या अग्रिमाचे समायोजन केले जाते. तथापि, कुशल देयक अदा करण्याच्या नवीन कार्यपध्दतीनुसार पंचायत समिती स्तरावरून कुशल देयकांपोटी अग्रिम देण्यात यावे. यामध्ये पंचायत समिती यांचे स्तरावर साहित्याची खरेदी करण्यात यावी व पुरवठादारास देयक अदा करण्यात यावे. तसेच घेतलेल्या अग्रिमाचे समायोजन पंचायत समिती स्तरावरच करण्यात यावे.

९. नजरचुकीने अथवा कोणत्याही कारणाने एखादे देयक दुबार प्रदान झाले अथवा चुकीच्या रकमेचे प्रदान झाले तर खाजगी पुरवठादाराकडुन वसुलीची प्रक्रिया पंचायत समिती स्तरावर तात्काळ करण्यात यावी.

१०. कुशल अदायगीमधील काही किरकोळ स्वरूपाची देयके पुरवठादारास अदा करावयाची झाल्यास अशा पुरवठादाराचे बँक खाते असणे जरूरी आहे. पुरवठादाराचे बँक खाते नसल्यास प्रथम त्यांचे नव्याने बँक खाते उघडुन पुढील प्रक्रिया सुरू करावी.

११. उपरोक्त कार्यपध्दतीत कुशल देयके अदा करण्याच्या प्रक्रियेमध्ये केंद्रीकरण होत असल्यामुळे तसेच पंचायत समिती स्तरावरील कामांमध्ये काही प्रमाणात वाढ होण्याची शक्यता आहे. त्यामुळे सर्व अभिलेखे पंचायत समिती स्तरावर जतन करून ठेवण्यात यावेत.

१२. सदर पध्दत या आदेशाच्या दिनांकापासुन प्रायोगिक तत्वावर ६ महिन्यांसाठी नागपूर व धुळे जिल्ह्यात राबविण्यात येत असल्याने ६ महिन्यानंतर सदर पध्दतीची उपयुक्तता तसेच ही पध्दत राबविण्यात आलेल्या अडचणी व अधिक चांगल्या पध्दतीने राबविणेसाठी सुचना असल्यास व ही पध्दत राज्यात राबविणे उपयुक्त आहे किंवा कसे याबाबतचा सविस्तर अहवाल आयुक्त,नरेगा,नागपूर, विभागीय आयुक्त,नागपूर/नाशिक व जिल्हाधिकारी,नागपूर/धुळे यांनी शासनास ६ महिन्यानंतर सादर करावा.

सदर आदेशाची तात्काळ अंमलबजावणी करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्र. २०१७०२२०१५३२३४१२१६ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Raskar Balasaheb Kisan

Digitally signed by Raskar Balasaheb Kisan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aaa93f4d4e49359ddfdb4a9eb4176d16d9032454ac5c700ad6e2a7ad0b3115db, cn=Raskar Balasaheb Kisan
Date: 2017.02.20 15:34:40 +05'30'

( बा. कि. रासकर )
उप सचिव (रोहयो), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२
३. मा. मंत्री/ राज्यमंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहाय्यक.
५. सचिव (रोहयो), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२

६. सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
७. आयुक्त, मनरेगा, नागपूर.
८. सर्व विभागीय आयुक्त
९. सर्व जिल्हाधिकारी, ( मुंबई व मुंबई उपनगर वगळुन)
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
११. सर्व विशेष कार्यकारी अधिकारीव उप विकास आयुक्त (रोहयो)
१२. सर्व उप जिल्हाधिकारी (रोहयो)
१३. संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे
१४. संचालक, सामाजिक वनीकरण, पुणे
१५. मुख्य अभियंता, लघुपाटबंधारे विभाग ( स्थानिक स्तर), पुणे
१६. सर्व विभागीय कृषी सहसंचालक
१७. समिती कार्यासन, कार्यासन ड-७, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
१८. सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१९. सर्व उप सचिव/अवर सचिव/ कक्ष अधिकारी, (मग्रारोहयो) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२०. कक्ष अधिकारी, रोहयो-१, सारसंग्रहकरिता
२१. निवड नस्ती, कार्यासन रोहयो-१०अ, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.